**राष्ट्रीय युवा दिन व राष्ट्रीय युवा सप्ताह साजरा करणेकरीता निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : निवियो-२०२३/प्र.क्र.९२/क्रीयुसे-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख : १४ मार्च, २०२४.

**वाचा:-**

१) समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. रायुदि-१०९८/प्र.क्र. १३६/ क्रीयुसे-३, दि. २८ डिसेंबर, १९९८.
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक,अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि. १२ एप्रिल,२०२३.
३) क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे पत्र क्रमांक निधी वितरण/योजना-१४२४/२०२३-२४/का-१०/११५५, दि. ०७ जून, २०२३ व दि. १७ जुलै, २०२३.
४) क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे पत्र क्रमांक क्रीयुसे/युदियुस/निधीवितरण/२०२३-२४/का-१०/५७९२, दि. १२ मार्च, २०२४

**<u>प्रस्तावना :-</u>**

राज्यात १२ जानेवारी "राष्ट्रीय युवा दिन" व दि. १२ ते १९ जानेवारी या कालावधीत "राष्ट्रीय युवा सप्ताह" साजरा करण्याकरीता संदर्भ क्रमांक (१) च्या शासन निर्णयान्वये मान्यता दिली आहे. त्या अनुषंगाने राज्यात सर्व जिल्ह्यांच्या ठिकाणी स्थानिक युवकांचे चर्चासत्र ( प्रदर्शन ) सांस्कृतिक कार्यक्रम व विविध स्पर्धा (निबंध, चित्रकला, वादविवाद, वक्तृत्व, समूहगान इ.) कार्यक्रमाचे आयोजन करुन राष्ट्रीय युवा दिन व राष्ट्रीय युवा सप्ताह साजरा करण्यात येतो. सदर उपक्रम साजरा करणेसाठी सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात रू. १.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला असून सदर तरतुदीमधून प्रति जिल्हा रू. ३०००/- प्रमाणे एकूण रु. १.०८ लक्ष ( अक्षरी रूपये एक लक्ष, आठ हजार फक्त ) इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

राज्यात १२ जानेवारी "राष्ट्रीय युवा दिन" व दि. १२ ते १९ जानेवारी या कालावधीत "राष्ट्रीय युवा सप्ताह" साजरा करण्याकरीता संदर्भ क्रमांक (१) च्या शासन निर्णयान्वये मान्यता दिली आहे. त्या अनुषंगाने राज्यात सर्व जिल्ह्यांच्या ठिकाणी स्थानिक युवकांचे चर्चासत्र (प्रदर्शन) सांस्कृतिक कार्यक्रम व विविध स्पर्धा (निबंध, चित्रकला, वादविवाद, वक्तृत्व, समूहगान इ.) कार्यक्रमाचे आयोजन करून राष्ट्रीय युवा दिन व राष्ट्रीय युवा सप्ताह साजरा करण्यात येतो. सदर उपक्रम साजरा करणेसाठी सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात रू. १.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला असून सदर निधीतून प्रति जिल्हा रू. ३०००/- प्रमाणे एकूण रु. १.०८ लक्ष ( अक्षरी रूपये एक लक्ष, आठ हजार फक्त.) इतका निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त उपक्रमाकरीता होणारा खर्च मागणी क्र-ई-३, २२०४ क्रीडा व युवक सेवा-१०३, विद्यार्थीतर युवकांसाठी युवक कल्याण कार्यक्रम (०१) विद्यार्थीतर युवक कल्याण कार्यक्रम (०१)(०१) युवक केंद्रे व इतर संस्थांना वित्तीय सहाय्य (कार्यक्रम) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) (२२०४ १४२४) या लेखाशिर्षाखालील मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा. सदरचे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहेत, त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

३. वित्त विभागाच्या दि.१२/०४/२०२३ च्या परिपत्रकातील सूचनांनुसार उपरोक्त तरतूद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी संबंधित जिल्हा क्रीडा अधिकारी यांना आंहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त (क्रीडा )यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१४१७०७२७७३२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHAILA BABAN YADAV

Digitally signed by SHAILA BABAN YADAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=a022aa350b02721b783553b5f04e9a637bb746c09f7ca3701d55e5feb1b5b141, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=01B315F80D517C9B1A66011D10F7F68624DB9044C98A741CFD0A1AEF85A9F714, cn=SHAILA BABAN YADAV
Date: 2024.03.14 17:17:26 +05'30'

**( शैला ब. यादव )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव ( क्रीडा ), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
४. सर्व विभागीय उपसंचालक, क्रीडा व युवकसेवा (संचालनालयामार्फत)
५. सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी ( संचालनालयामार्फत )
६. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
७. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (संचालनालयामार्फत)
८. वरीष्ठ कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, पुणे (संचालनालयामार्फत)
९. अवर सचिव (१४७१),नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. अवर सचिव, (व्यय-५/अर्थसंकल्प-८), वित्त विभाग मंत्रालय, मुंबई.
११. अवर सचिव ( अर्थसंकल्प ), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवडनस्ती, क्रीयुसे-३